# जेसी ओवेन्स ऑलम्पिक चॅम्पियन



जेन सटक्लिफ

मराठी : अश्विनी बर्वे



## ओकविले, अलबामा, १९२०

जेसीच्या नंग्या पावलांना जमिनीची सवय होती. त्याला आपल्या दोस्तांबरोबर पकडा-पकडी खेळायला आवडत असे.एक मुलगा त्याला पकडण्यासाठी पोहचला पण जेसी जोरात धावला. इतर मुलांनी टाळ्या वाजवून त्याचा हुरूप वाढवला. जेव्हा जेसी ओवेन्स पळाला तेव्हा त्याला कोणी पकडू शकले नाही.

जेसीचा जन्म १९१३ मध्ये झाला. त्याचे खरं नाव जेम्स क्लीवलैंड ओवेन्स होते. तो आपल्या सात भाऊ आणि बहिणींच्या बरोबर वाढला. ओवेन्स परिवार एका शेतावर राहत होते. ते खूप मेहनत करून मका आणि कापसाची शेती करत असत. पण त्यांचं अधिकतर पीक जमीन मालक घेवून जात असे.

ओवेन्स परिवार गरीब होता. जेसी बऱ्याचवेळा फाटके कपडेच घालत असे.



पण तरीही परिवाराकडे नेहमी खाण्यासाठी पुरेसे धान्य असे. आणि दुःखात ते एकमेकांना मदत करत असत. मजा करण्यासाठी जेसी आणि त्याची भावंड तलावात पोहत आणि मासे पकडत. त्यांना जंगलात शिकार करायला आवडे. उन्हाळ्याच्या रात्री ते बाहेर शेकोटी पेटवून झोपत असत.



रविवाररी जेसीचा पूर्ण परिवार चर्च मध्ये जात असे.चर्च संपल्यानंतर सगळे पुरुष शर्यतीत पळण्यासाठी एकत्र होत. जेसीचे वडील एक चांगले धावपटू होते. जेसीला त्याचे वडील धावणाऱ्या ट्रेन सारखे वाटत असत. त्याचं स्वप्नं होतं की तो एकदिवस खूप वेगाने धावेल..





ओवेन्स परिवाराचे घर लाकुड आणि गवतापासून बनवलेली एक झोपडी होती. घराच्या दरवाज्याच्या फटीतून गार हवा आत येत असे. प्रत्येक हिवाळ्यात जेसी खूप आजारी पडे.परिवार त्या ऋतूला "सैतानाची थंडी" म्हणत. आजारपणामुळे जेसी बारीक आणि कमजोर झाला होता. जेसीची आई आपल्या मुलांसाठी एक चांगल्या जीवनाचं स्वप्नं बघत असे. काळ्या लोकांना दक्षिणेत पुढे जाणं खूप कठीण होतं. म्हणून अनेक परिवार उत्तरेत शहराकडे गेले.कदाचित ओवेंस परिवाराला सुद्धा हेच करायला हवं.

जेव्हा जेसी नऊ वर्षाचा होता तेव्हा त्याचा परिवार ओहियो, क्लीवलैंडला आला. तिथं जेसीला एक नवीन शाळेत घातलं गेलं आणि त्याने नवीन दोस्त केले.

क्लीवलैंडचे लोक जसे बोलत नसत जसे जेसी आणि त्याचे कुटुंब बोलत असत. त्याच्या शाळेच्या पहिल्या दिवशी, जेसीच्या शिक्षिकेने त्याचे नाव विचारले. त्याने आपल्या दक्षिणी हेलात उत्तर दिले, “जे. सी.” शिक्षिकेला ते “जेसी “वाटलं. जे. सी. शिक्षिकेचे उच्चार नीट करतांना लाजला. तेव्हापासून त्याला “जेसी” म्हणायला लागले. क्लीवलँडमध्ये ओवेन्स परिवारचे जीवन आधीपेक्षा चांगले होते. जेसीचे वडील आणि भावांना एका स्टील कंपनीत नोकरी मिळाली.

जवळजवळ १२ वर्षाच्या वयात जेसीने काम करायला सुरुवात केली.शाळा सुटल्यानंतर त्याने पेट्रोल स्टेशनवर, बूट पॉलिश आणि नर्सरीत झाडांना पाणी घालण्याचे काम केले.







## ॲथलीट होण्याची तयारी

जेव्हा जेसी १४ वर्षाचा झाला,तेव्हा त्याने माध्यमिक शाळेत शिकण्यास सुरुवात केली.त्याच्या जिमचे नवीन कोच चार्ल्स रिले होते. कोच रिले यांना त्या पातळ पायाच्या मुलामध्ये काहीतरी खास दिसलं. त्यांना जेसीत एक ॲथलीट दिसला.

म्हणून कोचने जेसीला ट्रॅक –टीम मध्ये सामील होण्यास सांगितलं.जेसी आपल्या आई-वडिलांना ही बातमी देण्यास उत्सुक होता. पण त्यात एक समस्या होती.शाळा संपल्यावर लगेच ट्रॅक टीमचे ट्रेनिंग चालू होत असे. पण शाळा संपल्यावर जेसीला कामासाठी जावे लागे म्हणून कोचने जेसीला शाळा सुरु होण्याच्या आधी यायला सांगितलं.

रोज सकाळी, जेसी अभ्यासासाठी एक तास आधी उठत असे. त्यावेळी शाळा एकदम रिकामी आणि शांत असे. त्यावेळी ट्रॅकवर फक्त जेसिच्या पळण्याचा आवाज येत असे.जेसीने नेहमीच कोचने शिकवल्याप्रमाणे पळण्याचा प्रयत्न केला. त्याने आपलं डोकं उंच आणि सरळ ठेवलं. त्याने पाय खाली ठेवताच त्यांना उचलण्याचा अभ्यास केला. “असा पळ जसा की तू लाल गरम विस्तवातून पळत आहेस.” कोच म्हणाला. लवकरच जेसी एक सहज,सुंदर शैलीत पळू लागला. एका वर्षात जेसीचे पाय मजबूत झाले. त्याचा वेगही वाढला.







एक दिवस कोचने जेसीचा १०० मीटर धावण्याची वेळेची नोंद केली. जेसीचे पाय फिनिशिंग लाईन कडे पळत गेले. कोचने आपलं घड्याळ बघितलं. काय तो खरोखर एवढ्या वेगाने धावला होता का? कोचने दुसऱ्या घड्याळात पाहिलं. जेसी परत धावला.

दोन्ही वेळेस त्याला तेवढाच वेळ लागला. जेसी ११ सेकंदात १०० मीटर धावला होता. तो विश्व रेकॉर्डच्या खूप जवळ होता. कोच रिले यांचं बरोबर होतं. जेसी ओवेन्स एक अप्रतिम युवा ॲथलीट होता. आणि आता तो एक चॅम्पियन होवू लागला होता.

एक दिवस एक प्रसिद्ध धावपटू जेसीच्या शाळेत आले. चार्ली पैडॉकने दोन ऑलम्पिक पदकं जिंकले होते.जेसी त्यांच्याशी हात मिळवण्यास उत्सुक होता. त्यावेळी त्याने पण केला की तोपण एक दिवस ऑलम्पिक चॅम्पियन होणार. कोचला जेसीचे स्वप्नं चांगलं वाटलं. जेसी, तू फक्त पुढच्या धाव स्पर्धे बद्दल विचार करू नको. त्याने जेसीला भविष्याबद्दल विचार करायला सांगितले. “पुढच्या शुक्रवारपासून तू पुढच्या चार वर्षासाठी ट्रेनिंग सुरु कर,” कोच म्हणाले. जेसीने कोचचे म्हणणे ऐकले आणि कडी मेहनत केली.



१९३० मध्ये जेसीने ईस्ट टेक हायस्कूल मध्ये प्रवेश घेतला.त्याने कोच रिले यांच्याबरोबरचे प्रशिक्षण चालूच ठेवले.जेसीने हायस्कूल मध्ये ७९ स्पर्धेत भाग घेतला, त्याने त्यातल्या ७५ स्पर्धा त्याने जिंकल्या. त्याने लांब आणि उंच उडीत पण भाग घेतला. आता जेसी स्पर्धा जिंकण्यासाठी जास्त मेहनत करत होता. शेवटच्या वर्षात त्याने २२० मीटर स्पर्धेत विश्व रेकॉर्ड केले. जेसीला त्याच्या सहज सुंदर अंदाजात पळतांना पाहण्यासाठी लोकांची गर्दी उसळत असे. जेव्हा जेसी मैदानावर असे तेव्हा लोक मोठ्या मुश्किलीने इतर लोकांना बघत असत.





ओहियो

जेसीने १९३३ मध्ये हायस्कूलची शिक्षण पूर्ण केले. अनेक कॉलेजांना वाटत होते की तो त्यांच्या ट्रॅक-एंड-फील्ड टीम मध्ये रहावा. जेसीने ओहियो. स्टेट यूनिवर्सिटी निवडली. त्याचे नवीन कोच लॅरी स्नाइडर होते.

कोच स्नाइडरने जेसी ला अजून जोरात धावायला आणि लांबपर्यंत उडी मारायला शिकवलं.

जेसीने ओहियो स्टेट टीम साठी एका नंतर एक पदक जिंकले. मे १९३५ मध्ये, टीमने चपियनशिप मीट साठी मिशिगनचा दौरा केला. मित्रांबरोबर खेळतांना जेसिच्या पाठीला मार बसला.

कोच स्नाइडर यांना वाटत नव्हते की जेसीने स्पर्धेत भाग घ्यावा.पण जेसीने वेदनेची पर्वा केली नाही,त्याला माहित होते की तो जिंकेन.







पहिली शर्यत १०० मीटरची होती. असं वाटलं की जेसीसाठी स्पर्धा सुरु होताच संपली. तो जिंकला आणि त्याने एक विश्व रेकॉर्ड केले. दुसरी स्पर्धा लांब उडीची होती. विश्व रेकॉर्ड २६ फिट,२ इंचचे होते. जेसीने त्यावर आपलं लक्ष केंद्रित केलं. तो टेक-ऑफ बोर्ड कडे पळाला. आणि हवेत उडी मारली.

लांब उडीची जागा जवळ आली आणि अचानक ती जागा त्याच्या मागे आली. जेसीने जुने रेकॉर्ड ६ इंचा पेक्षा अधिक अंतराने तोडले. काही मिनिटानंतर त्याने २२० यार्ड डॅश आणि हर्डल्स मध्ये सुद्धा रेकॉर्ड मोडले. एका तासाच्या कमी वेळेत जेसीने नवीन तीन रेकॉर्ड केले आणि एक जुने रेकॉर्ड कायम राखले.

त्या दिवशी जेसी खूप प्रसिद्ध झाला. बातम्यांमध्ये त्याला “जगातल्या सगळ्यात वेगवान माणूस” त्याला म्हटलं गेलं.तो जिथं जाईल तिथं लोक त्याच्याशी हात मिळवू इच्छित असत.काही महिन्यानंतर जेसी जवळ उत्सव करण्यासाठी अजून काहीतरी होते. ५ जुलै १९३५ रोजी जेसीने मिनी रुथ सोलोमन शी लग्न केलं. जेसीजवळ वैवाहिक जीवनाच्या आनंदासाठी वेळ नव्हता.तो पानगळीत तो ओहिओ राज्यात परत गेला.

ट्रॅक एंड फील्ड टीम मध्ये प्रत्येकजण

ऑलम्पिक खेळाच्या बाबत बोलत होते. ऑलम्पिक पुढच्यावर्षी १९३६ मध्ये होणार होते. जेसी फक्त ऑलम्पिक मध्ये जाण्याचाच विचार करत होता.





वसंत महिन्यापर्यंत , जेसी परत धावू शकणार होता. एकदा परत तो स्पर्धा जिंकत होता आणि रेकॉर्ड तोडत होता. आणि ऑलम्पिकच्या पूर्व स्पर्धेच्या सगळ्या आयोजनामध्ये जेसी प्रथम स्थान वर राहिला. आता त्याचं स्वप्नं सत्यात येणार होतं. तो ऑलम्पिकमध्ये भाग घेण्यासाठी जाणार होता.

जेसीने कॉलेजमध्ये अभ्यास करण्याचा खूप प्रयत्न केला, पण त्याला नेहमी अभ्यासापेक्षा धावणं आवडायचं. तो एका विषयात नापास पण झाला. याचा अर्थ असा होता की वसंत महिन्यापर्यंत तो कोणत्याही स्पर्धेत भाग घेवू शकणार नव्हता. जेसीने आपलं प्रशिक्षण चालूच ठेवलं. पण हिवाळ्यात, तो आपल्या सहकाऱ्यांचा खेळ बघू शकला. ऑलम्पिकच्या आधीची पूर्वस्पर्धा येत होती? तो त्यासाठी तयार होईल का?



# ऑलम्पिक स्टार

जेसी आणि त्याचे अमेरिकी सहकाऱ्यांनी ऑलम्पिक खेळासाठी बर्लिन, जर्मनीचा दौरा केला. अडॉल्फ हिटलर १९३३ मध्ये जर्मनीचे नेता होते.

हिटलरला असे वाटायचे की गोरे जर्मन ख्रिश्चन इतर लोकांपेक्षा उत्कृष्ट आहेत. तो विशेषतः यहुदी आणि इतर रंगाच्या लोकांचा तिरस्कार करायचा. त्याला वाटे की ऑलम्पिक मध्ये गोरे जर्मन ॲथलिट इतर सगळ्यांना हरवतील. यामुळे जगाला कळेल की हिटलरचे विचार बरोबर होते. सगळ्या जगातले लोक हिटलर आणि त्याच्या विचारामुळे भयभीत झाले होते. त्यांना आशा होती की जेसी आणि इतर काळे ॲथलिट हिटलरला खोटं ठरवतील.





पण जेसी, हिटलरच्या बाबत विचार करत नव्हता. तो फक्त "एक किंवा दोन सुवर्णपदके घरी घेवून जाण्याचा" विचार करत होता.पण त्याआधी त्याला एक समस्या सोडवायची होती.त्याचे धावण्याचे बूट गायब झाले होते. त्याच्या कोचनी नवीन बुटांसाठी बर्लिनची दुकानं पालथी घातली होती. जेसिच्या पहिल्या धाव शर्यती आधी कोच यांना दोन नवीन बुटांचे जोड मिळाले. तरीही कोच काळजीत होते. नवीन बूट जेसिच्या पायाला जखमी तर करणार नाही ना? "जेव्हा ते बूट मला चावतील तेव्हा ते मला अजून पुढे पळण्यास भाग पाडतील," तो म्हणाला.





जेसी ची पहिली शर्यत १०० मीटरची होती. थंड पाऊस पडत होता.

ट्रॅक ओला होता.

पण जेसीने आपली नजर फिनिशिंग लाईनवर कैंद्रित केली.

धमाका! स्टार्टरची बंदूक चालवली गेली.

जेसीने लगेचच वेग पकडला.

त्याने इतर खेळाडूपेक्षा जवळजवळ १० फुट पुढे अंतिम रेख पार केली. जेसी ने सुवर्ण पदक जिंकलं. आणि त्या बरोबरच नवीन विश्व रेकॉर्ड केले. त्याने गर्वाने बघितले – त्यासाठी अमेरिकी झेंडा फडकवला गेला होता.

दुसऱ्या दिवशी लांब उडीची वेळ होती. प्रत्येक खेळाडू फायनलला पोहचण्यासाठी तीन वेळा प्रयत्न करू शकत होता. जेसीने नेहमीसारखा वार्म –अप केले. तो रनवे पासून खाली खड्ड्यात गेला.मग त्याला आश्चर्य वाटले. जज्जानी त्याला यासाठी परवानगी दिली नाही. आता त्याचा तो वार्म अप एक प्रयत्नाच्या स्वरुपात धरला जाणार होता. दुसऱ्या उडीत जेसीचे पाय टेक-ऑफ-बोर्डच्या थोडे पुढे गेले. ते पण नियमांच्या विरुद्ध होते.त्याच्याजवळ फायनल मध्ये जाण्यासाठी फक्त एकच संधी उरली होती. जेसी घाबरला.





अचानक, जेसीला आपल्या खांद्यावर कोणाचा तरी हात असल्याचे त्याला जाणवले. तो एक जर्मन लांब उडीवाला - लुत्ज़ लॉन्ग होता.

लुत्ज़, जेसी चा सगळ्यात कठीण प्रतिस्पर्धी होता. भला तो जेसीला काय सल्ला देवू शकला असता? लुत्ज़ ला माहित होतं की जेसी घाबरला आहे.

लुत्ज़ने जेसीला चिंता करू नको असं म्हटलं. जेसीची उडी खूप लांब होती, लुत्ज़ने म्हटलं,

महत्वपूर्ण गोष्ट ही आहे की जेसीने यावेळी चूक करू नये.

लुत्ज़ने जेसीला टेक-ऑफ बोर्ड पासून काही इंच मागे निशाण लावायला सांगितले. तिथून उडी मार,तो म्हणाला. मग जेसी निश्चिंत झाला आणि तेव्हा तो निशाणाच्या पुढे गेला नाही. जेसी हसला. तो एक खूप चांगला विचार होता. तो थोडावेळ थांबला आणि मग उडी मारली. यावेळी त्याने चांगले प्रदर्शन केले.



आता लांब उडीची फायनल होती. सगळ्या पुढे जेसी होता. मग लुत्ज़ ने त्याच्या इतकीच उडी मारली. आपली तिसरी आणि शेवटच्या उडीत जेसीने टेक-ऑफ बोर्डहून चांगली उडी मारली.

एक रिपोर्टर म्हणाला, की त्याला वाटले की जसं काही जेसी “जर्मनीच्या बाहेर उडी मारत आहे”. जेव्हा त्याने लैंड केलं तेव्हा त्याने सुवर्ण पदक जिंकलं होतं.

लुत्ज़ लोंगने रजत पदक जिंकलं.

लुत्ज़ धावत जेसीच्या जवळ गेला आणि त्याने त्याच्याशी हात मिळवला. दोन्ही ॲथलीट मैदान सोडतांना एक दुसऱ्याचा हात पकडून होते.



जेसीने 200-मीटर डॅशमध्ये पण सुवर्णपदक जिंकलं. आणि ४०० मीटर मध्ये सुद्धा. त्याने चार ऑलम्पिक रेकॉर्ड केले. हिटलर त्यामुळे खूप निराश झाला. पण जर्मनच्या लोकांनी जेसिव्र खूप प्रेम केले. त्यांनी स्टेडियम मधून त्याच्या नावाचा परत परत जप केला. जगातल्या सगळ्या वर्तमानपत्रात जेसीचे फोटो छापले गेले. जेसीने आपलं स्वप्नं साकार केलं. आता तो एक ऑलम्पिक चैंपियन होता. आणि एक अमेरिकी हिरोही होता.

.





# शेवटचे शब्द

जेव्हा जेसी ऑलम्पिकवरून परत आला,तोपर्यंत तो आणि त्याची पत्नी रुथ यांच्या तीन मुली पैकी पहिल्या मुलीचा जन्म झाला होता. जेसीला उदरनिर्वाहासाठी नोकरीची गरज होती. त्याने खूप साऱ्या नोकऱ्या केल्या. तो एक बैंड मास्टर, सार्वजनिक वक्ता आणि बास्केटबॉल टीमचा मालक होता आणि त्याने एक ड्राई-क्लीनिंगचा व्यवसाय सुरु केला. त्याला बेसबॉल खेळासारख्या खेळाच्या आयोजनातल्या प्रदर्शनात धावण्यासाठी सुद्धा पैसे मिळत असत.

आपल्या जीवनात जेसीला वक्ता म्हणून खूप मागणी होती. लोकांना त्याचा बुलंद आवाज आणि त्याच्या कहाण्या आवडत असत. जेसीचा संदेश सकारात्मक आणि प्रेरक असे. अमेरिकेत लोक त्यांचा रंग किंवा त्याची पार्श्वभूमी काही असो, मेहनत आणि दृढ संकल्पच्या साहाय्याने आपलं स्वप्नं साकार करू शकतात.

जेसीचा आवडीच्या विषयांपैकी एक विषय होता की १९३६च्या ऑलम्पिक मध्ये लांब उडीच्या वेळी लुत्ज़ लॉन्गने त्याला कशी मदत केली.कितीतरी लोकांनी या गोष्टीच्या खरेपणावर प्रश्न विचारले. कारण कोणीही वास्तवात त्यादिवशी जेसी आणि लुत्ज़ला एकत्र बोलतांना पाहिलं नव्हतं. पण जेसी नेहमी आपल्या या गोष्टीवर अडून राहिला. त्याने लुत्ज़बरोबरच्या मैत्रीला “सगळ्यात मोठा ऑलम्पिक पुरस्कार” म्हटलं.

जसजसा तो मोठा झाला, जेसीने भाषणं देणं, पुरस्कार देणं आणि ॲथलेटिक कार्यक्रमात भाग घेणं, आणि जगभर प्रवास करणं चालू ठेवलं. त्यांनी आपलं जीवन आणि आपल्या विश्वासाच्या बाबत चार पुस्तके लिहिली. १९८० मध्ये, जेसी ओवेन्सचे वयाच्या ६६वय वर्षी निधन झाले. त्यांना नेहमी त्यांचे समर्पण आणि त्यांचे अद्भुत ऑलम्पिक उपलब्धीसाठी लक्षात ठेवलं जाईल.

# महत्वपूर्ण तारखा

१९१३ जेम्स क्लीवलैंड ओवेन्सचा जन्म १२ सप्टेंबरला अलाबामात ओकविले मध्ये झाला.

१९२२ आपल्या परिवाराबरोबर ओहियोच्या क्लीवलैंड ला गेले.

१९२७ फेयरमाउंट जूनियर हायस्कूल मध्ये प्रवेश घेतला; जिथं त्याचे कोच चार्ल्स रिलेशी भेट झाली.

१९३० ईस्ट टेक्निकल हायस्कूल मध्ये प्रवेश घेतला.

१९३३ शिकागो, इलिनॉय मध्ये राष्ट्रीय अंतरविद्यालय चैम्पियनशिपमध्ये तीन स्पर्धामध्ये विजय प्राप्त केला, ओहियो स्टेट यूनिवर्सिटी मध्ये प्रवेश घेतला.

१९३५ मिशिगनमध्ये बिग टेन ट्रॅक एरिड फील्ड चैंपियनशिपमध्ये, तीन विश्व रेकॉर्ड तोड़ले आणि अजून एक टाय झाला; मिनी रूथ सोलोमन शी लग्न केलं.

१९३६ बर्लिन, जर्मनीमध्ये ऑलम्पिक मध्ये चार सुवर्णपदके जिंकली.

१९५० एसोसिएटेड प्रेस द्वारा नामांकित उत्कृष्ट ट्रॅक ॲथलिट ऑफ़ द हाफ सेंचुरी

१९५५ अमेरिकी विदेश विभागासाठी सद्भावना राजदूतच्या रुपात मोठ्या प्रमाणावर प्रवास सुरु केला.

१९७३ संयुक्त राज्य ऑलम्पिक समितीच्या निदेशक मंडळाचे सदस्य झाले.

१९७४ ट्रॅक एंड फील्ड हॉल ऑफ फ़ेम साठी निवडले गेले.

१९७६ राष्ट्रपती गेराल्ड फोर्ड द्वारा मेडल ऑफ फ़्रीडमने सम्मानित केलं गेलं.

१९७९ राष्ट्रपती जिमी कार्टरद्वारा लिविंग लीजेंड्स अवार्ड ने सम्मानित केलं गेलं.

१९८० ३१ मार्च ला टक्सन, अरिज़ोना मध्ये कॅन्सरने मृत्यू झाला.